# समकालीन गझल

अंक तिसरा

हिवाळा २०२१




संपादक

अनंत ढवळे * समीर चव्हाण * विजय दिनकर पाटील

**समकालीन गझल**

मराठी अनियतकालिक

संपूर्णत: अव्यावसायिक आणि अवैतनिक उपक्रम

**संपादक मंडळ**


अनंत ढवळे, समीर चव्हाण, विजय दिनकर पाटील

इ मेल:

anantdhavale@gmail.com

chavansameer@gmail.com

vdpatil74@gmail.com


**मुखपृष्ठावरचे चित्र**

'द ग्लांस' , चित्रकार श्री. विजय नायर

प्रा. विजय नायर हे सुप्रसिध्द इंग्रजी कवी आणि चित्रकार आहेत.

## संपादकीय नोंद

समकालीन गझलचा तिसरा अंक वाचकांच्या हाती देताना आनंद होतो आहे. कोविड १९ ने विखंडित झालेल्या काळाच्या पार्श्वभूमीवर येणारा हा अंक समकालीनच्या एकंदर भूमिकेशी सुसंगत असाच उतरून आलेला आहे. लेखकांनी भूमिका घ्याव्यात की नाही असा प्रश्न उपस्थित केला जाऊ शकतो पण तो वेगळा मुद्दा आहे. व्यापक गोष्टींसाठी कधी-कधी विशिष्ठ (क्वचित प्रसंगी आग्रही) भूमिका घ्याव्या लागतात, त्यातलाच हा एक भाग. मराठी गझलेतील नव्या जाणिवा आणि वैचारिक वळणांची पाठराखण करणारा हा उपक्रम इतकी वर्षं सुरू राहू शकला आहे ह्यातच सर्व आले. बाकी गेल्या दोन अंकांप्रमाणे या अंकाचे देखील स्वागत होईल अशी अपेक्षा आहे. अंकामधे सहभागी झालेल्या सर्व कवींचे आभार आणि अभिनंदन !

**अनंत ढवळे**
संस्थापक संपादक,
समकालीन गझल

## समकालीन गझल: एक अवलोकन

समकालीन गझल प्रत्यक्षात आल्यानंतर वर्षांतून एक अंक आणि निरंतर व्यासपीठ अश्या माध्यमांतून संवाद साधायचा प्रयत्न समकालीनने चालू ठेवला. त्याबरोबरच शक्य तितके उर्दू-फ़ारसी गझलेच्या तसेच सूफी आणि मराठी संतसाहित्याच्या परंपरांचे दर्शन आणि त्यातून मराठी गझलेतील शक्यतांसंबंधीत मार्गदर्शन अश्या स्वरूपाचे काम वेळात वेळ काढून चालू ठेवले. समकालीनचा कळत नकळत प्रभाव अनेक फोरम वरच्या बहुपदरी चर्चांवरून जाणवण्याइतपत आहे. समकालीनच्या अंकांतले अनेक मुद्दे, जसे की गझल आणि संतसाहित्य असो की सूफीतत्वाचा गझलेवरील प्रभाव असो, विचारात घेतले जाणे तसेच गझलेच्या बाह्यांगावर बेसुमार चर्चा करणारा मराठी गझल वर्ग ह्या आणि अश्याच विषयांवर वैचारिक चर्चा करायला लागणे ही आनंदाची गोष्ट आहे. समकालीनच्या अनेक वाचकांनी वेळोवेळी दिलेल्या पाठबळामुळे हे सगळे शक्य झाले ह्यात कुठलीही शंका नाही.

अगदी प्राथमिक बाब, जी वेळोवेळी वेगवेगळ्या व्यासपीठांवरून सांगितली जाते, ती म्हणजे गझल एक कविताच आहे. कश्या स्वरूपाची कविता म्हटले की एका विशिष्ट ढाच्याची कविता म्हणत गझलेची बाराखडी गिरविली जाते. एवढे म्हणून काहींचे समाधान होत नाही मग गझल ही एका विशिष्ट गुणधर्माची कविता असे जोडले जाते. कोणता हा गुणधर्म विचारले की हा गुणधर्म (ज्याला गझलियत म्हणून ओळखले जाते) मांडू म्हणता मांडता येत नाही, जो केवळ निर्मळ मनाने अनुभवता येतो अशी भावुक उत्तरे सर्वश्रुत आहेत. ही बखाने इतकी अपरंपार वाटतात की एखाद्या तिऱ्हाइताला गझल म्हणजे अनादि अनंत वाटला तर नवल वाटू नये. ज्याचे कारण ह्या बखानांच्या पुष्टीला ह्या विधेच्या दृढावलेल्या गैरसमजातून काल्पनिक स्वरूपावर यमकानुसारी भावशून्य आणिक बनावटी अश्या तथाकथित गझलांचा भोग चढविला जातो. असो हे अनुभव अगदी अलीकडचे नसले तरी अश्या मानसिकतेची झळक अधेमधे मिळत राहतेच. तेव्हा मराठी गझल वर्तुळात अंधश्रद्धानिर्मूलनाची कितपत गरज आहे हे लक्षात यावे. अन्यथादेखील समकालीनची आवश्यकता अधोरेखित करता येईलच.

गझलविधेची व्याख्या देणे किंवा तंतोतंत वर्णन करणे शक्य नसून असा प्रयत्न एखाद्या अमूर्त गोष्टीला मूर्त आणि म्हणूनच मृत ठरवण्यासारखा आहे. गझल म्हणजे काय हा प्रश्न चुकीचा असून गझलेच्या नेमक्या खुणा कोणत्या हा प्रश्न अकादमीय मूल्याचा ठरतो. प्रश्न गहन आहे तेव्हा तो लांबलचक, जड-अवजड विशेषणे लावून सुटण्यासारखा नाही. ह्यासाठी अत्युत्तम कवितेचे निकष तर लक्षात घ्यावे लागतीलच पण त्यापुढे जाऊन गझलविधा स्वतंत्रपणे तिचे स्वरूप, शब्द (साधन) आणि अर्थ (साध्य) ह्या दोन्ही अंगांनी, विचारात घेऊन पहावी लागेल. गेली अनेक शतके अनेकांनी ज्या काही पायवाटा, पाऊलखुणा शोधल्या आहेत त्यांचे (कुठलाही पूर्वग्रह न ठेवून केलेले) अवलोकन केल्याशिवाय हा प्रांत हातोहात येईल ह्या

भ्रमातून जेवढ्या लवकर आपण बाहेर पडू तेवढे उत्तम. ज्याप्रमाणे ज्ञानेश्वर किंवा समुच्च नाथसंप्रदाय समजून घ्यायचा असेल तर गोरखनाथ समजून घेण्याशिवाय गत्यंतर नाही. सांगण्याचा मुद्दा व्यक्तिविशेष वा व्यक्तिमाहात्म्य नसून परंपरा समजून घेणे आहे. त्याप्रमाणेच आत्ता लिहिणाऱ्यांनी आत्तापर्यंत काय आणि किती भरीचे लिहिले हे जोखल्याखेरीज ह्या वरपांगी मर्यादित वाटणाऱ्या विधेतील शक्यतांचा आवाका लक्षात येणे नाही. कुठल्याही स्थितीगतीच्या कवीला समकालीन साहित्याची दिशा कुठे चालली आहे ह्याचे भान नसेल तर त्याचे लिखाण दिशाहीन आणि तत्कालिक ठरू शकते, जेणेकरून त्याच्या वाटेला क्षणिक वाहवा येते, जी येते आणि तितक्याच त्वरेने जाते देखील.

असो, अगोदरचे किती चुकीचे होते, हे सांगून आपण काहीही न करता त्यांच्या चुकांच्या भांडवलावर निर्वाह करू ही मानसिकता समकालीनची मुळीच नव्हे. ह्या ठिकाणी वेळोवेळी मांडलेली समकालीनची भूमिका काहीश्या विस्ताराने सांगावीशी वाटते. समकालीनचा प्रयत्न गझल कशी लिहावी हा नसून अश्या सर्वसाधारण चिंतन-सरणीचे समकालीन समर्थन करीत नाही. गझल काय कुठल्याही साहित्यासाठी रियाज, सजगता, परंपरेचे अवलोकन आणि अनुशीलन आवश्यक असते ह्या आणि अश्या अनेक गोष्टी पटवून देणे, गझलेच्या आणि विशेषकरून साहित्याच्या प्रगल्भ जाणिवेसाठी विचारात्मक दालन खुले करून देणे, त्याप्रमाणेच नव्या वळणाच्या आणि स्वतंत्र विचारांच्या निर्मितीला पुढे आणणे देखील आहे. कुठल्याही विषयाच्या आकलनासाठी मूळ प्रवाहाकडे जावे लागते आणि ह्या मूळ प्रवाहांचा मागोवा घेणे समकालीनचा ऑनगोइंग प्रोजेक्ट आहे. समकालीन गझल गझल-लेखन आणि गझल-समीक्षा ह्या दोन्ही गोष्टी महत्त्वाच्या मानतो हे ठसवून सांगावेसे वाटते. इथे वसंत आबाजी डहाके ह्यांच्या हवाल्याने समीक्षक राजशेखर (इ.स. ८८०-९२०) ह्यांची काही मते उद्धृत करणे संयुक्तिक ठरेल:

'राजशेखरांच्या या मतानुसार कवितेप्रमाणे समीक्षा हेही प्रतिभेचेच कार्य होय. काव्यव्यापार आणि समीक्षाव्यापार यांच्या स्वरूपांत भिन्नता असली तरी ते एकदुसऱ्यांना पूरक असेच व्यवहार आहेत. किंबहुना, एका वाड्गमयव्यवहाराचेच ते दोन अभिन्न असे पैलू आहेत. कवींमध्ये समीक्षादृष्टी असते आणि समीक्षकांमध्ये काव्यदृष्टी असते. कधीकधी एकच व्यक्ती कवी आणि समीक्षक अशा दोन्ही भूमिका पार पाडताना दिसतात. सर्जनप्रवृत्ती आणि समीक्षाप्रवृत्ती यांत मूलतः द्वंद्व नाही.'

डहाकेंच्या मते लिहिणे आणि वाचणे ह्या प्रक्रिया एक आधी आणि दुसरी नंतर अश्या स्वरूपाच्या नसून त्यांतील भेद इतकाच की एक 'सौंदर्यगर्भ' व्यवहार तर दुसरा 'ज्ञानगर्भ' व्यवहार आहे.

हे मान्य करायला हवे की गेल्या दीड दशकात मराठी गझलेचा चेहरा-मोहरा बदलत आहे. सुरेश भट (१९३२-२००३) मराठी गझलेचे प्रतिष्ठाता आणि प्रवर्तक होते हे सर्वमान्य असून त्यांच्या प्रभावाखाली किमान दोनेक पिढ्या राहिल्या ही गोष्ट नमूद करायची गरज पडू नये. फ़ारसीमध्ये म्हण आहे 'नक्ल रा अक्ल बायद' अर्थात नक्कल करायला पण अक्कल लागते. ह्या म्हणीचे एक एक्स्टेंशन आहे ते असे की ज्यांना अक्कल असते ते नक्कल करीत नाहीत. जे काही असो भटांच्या नंतरच्या पिढीची, काही सन्मानीय अपवाद वगळता, गोम झालेली जाणवते. विशेषकरून ह्या पिढ्यांतील शेकडो नावांत, जे भटांपुढे जाऊन थोड्याफार प्रमाणात वेगळा विचार देऊ शकले किंवा भटांच्या प्रतिमाविश्वाबाहेर जाऊ शकले, बोटावर मोजता येतील. भट प्रामुख्याने सामाजिक भान राखणारे आणि रोमँन्टिसिझमकडे कल असलेले कवी होते. त्यांनी आपली शैली आणि प्रतिमा-विश्व प्रस्थापित केले. औचित्यपूर्ण शब्दनियोजन (मुनासबते-अल्फ़ाज़) तसेच म्हणींचा, उपमा अलंकारांचा सटीक वापर त्यांच्या गझलांची काही वैशिष्ट्ये म्हणता येतील. प्रस्तुत शेर, जो 'एल्गार' मधून घेतला आहे, त्यांच्या शैलीचा निदर्शक आहे.

**लागले न झाडांना दोनचार शिंतोडे**
**नाचही सुरू झाला जंगलात मोरांचा**

तेव्हा कवितेत भटांना इमिटेट करताना मूळ वृत्ती बाजूला ठेवून निभावणे तसे कठीण काम होते, आणि कदाचित त्यामुळेच अनेकांची पंचाईत झालेली दिसते. उदाहरणार्थ भटांचा त्या वेळच्या प्रस्थपितांविरोधातला संघर्ष त्यांच्या रचनांत वारंवार तोंड वर काढतो. परंतु भटांचा थोर पाठिंबा असताना ह्या संघर्षाचा उल्लेख किंवा तक्रारीचा स्वर भटांनंतरच्या पिढ्यांच्या तोंडी अप्रशस्त वाटतो. असे नाही की ह्या पिढ्यांकडून चांगले शेर किंवा चांगल्या गझल लिहिल्या गेल्या नाहीत. पण दुर्दैवाने बहुतेकजण अनेक पूर्वग्रह आणि गैरसमजांनी ग्रस्त दिसून येतात. ह्या पिढ्या वास्तविकतेपासून दूर कल्पनाविश्वात रममाण दिसतात जे निखळ कवितेला बाधक आहे. काही पूर्वग्रहांची उदाहरणे द्यायची म्हटली तर जग निष्ठूर आहे, घात लावून बसले आहे, मला झुकता आले नाही, मी आयुष्य जाळले, मी कारकीर्द गाजवली वगैरे वगैरे आणि कल्पनाविलासांची उदाहरणे द्यायची म्हटली तर व्यथांना सांजवेळी बोलावणे, वेदनांचे सोहळे करणे, कविता जगणे इत्यादी इत्यादी. कदाचित ह्या पूर्वग्रहांचे मूळ उर्दूमध्ये असलेली बेसुमार रिवायती शायरी असण्याची शक्यता आहे. असे नाही की ह्या रिवायती संकल्पना नाविन्याने वापरता येणार नाहीत.

**डूबे उछले है आफ़ताब हनूज़**
**उस ने देखा है तुझ को दरिया पर**

मीरच्या ह्या शेरात प्रियतमाला पाहिल्याची घटना सामान्य आहे पण पाहिल्यानंतरची मनोदशा अभिव्यक्त करण्याच्या अनोख्या पध्दतीमुळे शेरात गंमत येते. ह्या स्तरावर पण फार थोडा विचार झालेला जाणवतो. प्रयोगांमागे धावण्याचा अनाठीयीपणाही सुरुवातींच्या पिढ्यांमध्ये कमालीचा दिसतो. उदाहरणादाखल छोट्या बहरमध्ये गझल लिहायचा अटटाहास मग भले गझल विधांनाची मालिका होवो हे अनाकलनीय आहे. ह्या पिढ्यांतील लिखाणातले विषय हे बऱ्याचदा भटांच्या कल्पनाविश्वाच्याभोवती फिरताना दिसतात ही अगतिकता एक कवी म्हणून समजणे अवघड आहे. काही अंशी ह्याचे कारण त्या काळात आणि नंतरही भटांनी लिहिलेल्या जमीनीत मोठ्या प्रमाणात रचना केल्या गेल्या. तेच रदीफ, फिरून फिरून तेच काफिये (काफिया ह्या शब्दाचे मऱ्हाठी अनेकवचन) आल्यावर विषयही तेच तेच येण्याची शक्यता संभवते. रामशास्त्री, मारेकरी, राजपुत्र, राजवाडा, सूर्य, चंद्र, चांदणे, सुरा, फुलांची वस्ती, गंधवार्ता, मैफल, क्रूस, कापूर, उखाणा इत्यादी प्रतिमा, ज्या भटांच्या कवितांत मोठ्या प्रमाणात दिसतात, म्हणता म्हणता त्या पिढ्यांतील बहुतेक गझलकारांमध्ये कमीजास्त प्रमाणात आढळू लागल्या. ह्यामुळे ह्या काळातील गझलांमध्ये एकसुरेपण आणि रिपिटिशन जाणवते. 'उर्दू की इश्क़िया शायरी' ह्या आपल्या पुस्तकात फ़िराक़चे इश्क़िया (रिवायती) शायरीविषयीचे मत लक्षात घेण्यासारखे आहे:

**'... उर्दू की इश्क़िया शायरी का इत्र या जौहर हमें उर्दू ग़ज़ल में मिलता है । क्या ग़ज़ल की तकनीक हमें इसकी इजाज़त देती है कि ठेठ मुहब्बत के जज़्बातो-नफ़्सियात या हयातो-कायनात के मरकज़ी हक़ायक़ (केन्द्रीय वास्तविकता) और उसूलों के अलावा हम कुछ कहें ? ... लेकिन एकसुरापन, थका देने वाली यकसानियत की ख़राबी से भी ग़ज़ल को बचाना चाहिए ।'**

फ़िराक़ला अभिप्रेत एकसुरेपणा ह्या काळातील लिखाणात प्रकर्षाने जाणवतो. दुदैवाने म्हणावे लागते की ह्या पिढ्यांतील बहुतेकांनी निम्मी उर्जा गझलतंत्रातच व्यय केली. तंत्र हे आवश्यक आहे पण तंत्राचा विचार नियम म्हणून होणे प्राथमिकता आहे. त्यानंतर तो अभिव्यक्तीच्या-आशयाच्या दिशेने झाला पाहिजे हा बोध वा विचार सखोलपणे झालेला जाणवत नाही. तसेच ह्या पिढ्या गझलेच्या रचनात्मक बाबींव्यतिरिक्त प्रश्न विचारताना फारसा दिसून येत नाही, अश्या मताला पुष्टी देणारे संदर्भ आढळतात. समीक्षकमित्र अनंत ढवळे म्हणतात की ह्या पिढ्यांनी कसेही असो लिहिता हात ठेवला जेणेकरून मराठी गझल किमान जिवंत राहिली. त्याचप्रमाणे भटांच्या गझलेतले काही चांगले गुण, जसेकी शब्दनियोजनातली चुस्ती, वेगवेगळ्या वृत्तांची हाताळणी, म्हणींचा वापर, ह्या पिढ्यांनी जोपासले. तेव्हा त्यांचे योगदान पूर्णत: नाकारणे निव्वळ अप्रामाणिकपणा ठरेल. दुसरीकडे ह्या पिढ्यांतील अनेकांनी प्रश्न विचारण्याची (उदाहरणार्थ लोकांच्या पसंतीला उतरलेले साहित्य सर्वोत्तम का?) संस्कृत-

उर्दूची मोठी परंपरा समोर असताना केवळ व्यक्तिपूजेच्या आहारी जाऊन शिष्योत्तमाच्या स्पर्धेत उतरून मराठी गझलेची अपरिमित हानी केली ही दुर्दैवी गोष्ट आहे.

उपरोक्त पिढ्यांतील लिखाणापेक्षा गेल्या दशकात झालेले प्रकरण भलेबरे काहीही असो वेगळे आहे आणि सुदैवाने कुठल्या एका प्रभावाखाली वरपांगी दिसून येत नाही. हा प्रवाह पारंपारिक प्रयोगांपासून दोन हात दूर राहत आपले प्रतिमाविश्व शोधायला बाहेर पडत आहे. सुरुवातीच्या पिढ्यांतील आक्रमकता, आत्मप्रौढत्व, दोषारोपण-वृत्ती वा कल्पनाविलास इथे क्वचितच जाणवतो. ह्या पिढीला स्वरयमक, भाषेतली मोडतोड, प्रादेशिक भाषांमधील फ्रेजेस, प्रयोगशीलता ह्यांचे वावडे नाहीय आणि महत्त्वाचे म्हणजे ह्या साधनांमुळे अभिव्यक्तीत येणारी लवचिकता ह्या पिढीने हेरली आहे. ह्या पिढीची उर्दूच्या महान परंपरेची ओळख होत आहे, आणि कदाचित त्यामुळेच ही पिढी मराठी गझलेतल्या शक्यतांचे क्षितीज किती विस्तारू शकते हे जोखू पहात आहे, आणि ही अत्यंत आशादायक गोष्ट आहे. नव्या पिढीला हात घालण्यासाठी, खणून काढण्यासाठी अनेक गोष्टी आहेत आणि संदर्भासाठी उर्दू-फ़ारसी साहित्य वगळूनदेखील चारेक दशकांचे मराठी गझलेतले विपुल चांगले-वाईट लेखन आहे. जसे वर म्हटले की दोनचार चांगले शेर किंवा चांगल्या गझल लिहून तत्काल वाहवा मिळू शकते. पण सिग्नेचर आणि अभिव्यक्तीचे अत्युत्त्म स्तर गाठणारी गझल लिहिण्याचे आव्हान ह्या आणि येणाऱ्या पिढ्यांपुढेही आहे. तत्कालिक प्रसिद्धीच्या दिशाभूल करणाऱ्या वाटा, साहित्य-मूल्यमापनाच्या अक्षमतेची जाणीव, जुन्या पिढींप्रमाणेच परंपरेतून आलेले पूर्वग्रह, मूलभूत गैरसमज, आणि अभ्यासाबाबतची अपार उदासीनता चिंतेची बाब आहे. अकादमीय शिस्तीची गणती न करता आपले अज्ञान खुलेआम पाजळणारी मानसिकता केवळ एखाद व्यक्तिपुरती सीमित न राहता झपाट्याने फोफावयाला वेळ लागत नाही. नवी पिढी ह्या फोफाट्यात येऊ नये ह्या समकालीनच्या प्रयत्नांचाच प्रस्तुत लेख एक भाग आहे.

जवळपास दहाएक वर्षांपूर्वी कवी-समीक्षक अनंत ढवळेंनी रिवायती ह्या संज्ञेचा मराठी गझल जगताला परिचय करून दिला असे म्हटले तर वावगे ठरू नये. वेळोवेळी अनेक फोरमवरून त्यांनी रिवायतीला केलेला विरोध, ज्याचा साक्षीदार या लेखाचा लेखक आहे, त्यावेळेस चर्चेचा आणि वादाचा भाग होता. चांगल्या गझलेच्या पाऊलवाटा शोधायच्या असतील तर रिवायती-गैररिवायती मधले भेद समजून घेणे आवश्यक आहे. ह्यासाठी रिवायती म्हणजे काय ह्यात न पडता रिवायतीच्या खुणा काय आहेत ते पाहूया. 'उर्दू ग़ज़ल का इश्क़िया पक्ष' ह्या आपल्या लेखात गोपीचन्द नारंग रिवायतीच्या रंगरूपावर भाष्य करतात:

**'परम्परागत रिवायती इश्क़िया शाइरी में शाइर का अधिकतम झुकाव स्वयं अपने भावों की ओर रहता है । वह अपने व्यक्तित्व के आवरण में ऐसा बंध जाता है कि जीवन एवं सृष्टि की रहस्य भरी समस्याओं से उसका कोई सम्बन्ध नहीं रहता । वह हर दुःख को**

**व्यक्तिगत इश्क़ का दुःख समझता है और भीतर ही भीतर सुलगता और कुढ़ता रहता है। परन्तु महान इश्क़िया शाइरी में शाइर इश्क़ की राह में ऐसा नहीं मारा जाता कि कहीं का न रहे, अपितु अपने उच्च प्रयासरत व्यक्तित्व के प्रभाव से, अर्थात अपने मस्तिष्क एवं सम्बुद्धि तथा सौन्दर्य प्रतिभा से अपनी इश्क़िया अनुभूतियों एवं भावों में ऐसा विस्तार पैदा करता है कि उसकी शाइराना अनुभूति में प्रिय के दुःख (ग़मे-जानां) और संसार क दुःख (ग़मे-दौरां) की औपचारिक सीमाएं इस तरह मिट जाती हैं कि उनमें भेद करना मुश्क़िल हो जाता है। इस स्तर पर पहुंच कर इश्क़िया शाइरी में अनन्तता, उत्कृष्टता, जीवन के रहस्यों को खोलने की क्षमता और इश्क़ का औपचारिक आह्लाद और दुःख से ऊपर उठने और निस्पृहता की वह शान पैदा हो जाती है जिसमें 'तग़ज़्ज़ुल' (ग़ज़ल का आन्तरिक सौन्दर्य) और तसव्वुफ़ अलग-अलग नही रहते और शाइरी में सामानयतः प्रतिभापूर्ण आध्यात्मिक (मैटाफ़िज़िकल) शान पैदा हो जाती है।'**

नारंगांचे मत हे इश्क़िया शायरीच्या संदर्भात आहे, पण एकूणच शायरीला लावता येईल. नारंग रिवायती आणि महान शायरी (ज्याला आपण केवळ सोयीसाठी गैररिवायती म्हणूया) अशी तुलना करतात. थोडक्यात रिवायती-गैररिवायतीमधला फरक हा वैयक्तिक-वैश्विकमधला आहे. रिवायती जितकी साधारण, निरस, ढोबळ आहे तितकी गैररिवायती असाधारण, चैतन्यमय, गुंतागुंतीची आहे, आणि अश्याप्रकारची कविता केवळ अनुभूती आणि भावभावनांनी लिहिली जात नसून बुद्धिमत्ता-प्रतिभेविना असंभवनीय आहे. संस्कारातून किंवा सरावातून लिहिताना अनुभवांशी फारकत घेण्याची शक्यता उद्भवते हा रिवायती लिहिणाऱ्यांच्या वाटेतला फार मोठा धोका आहे. ह्याचा अर्थ असा मुळीच नव्हे की संस्कारातून आलेल्या सगळ्याच गोष्टी टाकाऊ आहेत. संस्कारातून आलेल्या गोष्टी सविवेक पारखून त्यातल्या चांगल्या गोष्टी टिकवून ठेवणे आणि अंतप्रेरणेने त्यात जोडत राहणे कलाकाराचे कर्तव्य ठरते. साहित्यिक अभिव्यक्तिचे सर्वोत्तम स्तर गाठण्यासाठी कल्पनाधिष्ठित चित्र निर्माण करणारे शब्द (ज्यांत अस्तित्ववादी ओळख होण्याचे सामर्थ्य नसते) अस्तित्ववादी ओळखीचे किमान प्रतिबिम्ब बनणे हे कुठल्याही महान कलाकारासाठी मोठे आव्हान ठरते. ह्यासाठी अनुभवनिष्ठ तथा बुद्धिनिष्ठ भावनांनी प्रेरित होणे अत्यावश्यक आहे.

इथे हे लक्षात घ्यायला हवे की रिवायती शब्दकोशीय अर्थाने (म्हणजे पारंपारिक किंवा संस्कारातून आलेले) अपेक्षित नाही. कुठल्याही भाषेत वा विधेत जसे रिवायतीच्या जंजाळातून बाहेर पडणे अशक्य असते, त्याचप्रमाणे पूर्णत: गैररिवायतीचे पुरस्कर्ते होणेदेखील. ह्याचे कारण कविता रिवायती नसून रिवायती ही मानसिकता आहे. अर्थातच मराठी गझल अद्याप रिवायती आणि गैररिवायती हा भेद कळण्याच्या प्रक्रियेत आहे. रिवायतीमध्ये गैर काय अशी पृच्छा करणे योग्यच आहे पण त्यात गैर नाही असा आग्रहदेखील अनुचित आहे. इथे स्पष्ट

करावेसे वाटते की समकालीनचे काम आपले मत थोपविणे नसून दोन्ही बाजू पुढ्यात ठेवणे, उलगडून दाखवणे आहे. रिवायती प्रमाणेच जदीदची (मॉर्डन) चर्चा इथे प्रशस्त ठरते. हा काळ जदीदच्या चलतीचा आहे आणि जदीद काय हे समजून न घेता डोळे बंद करून तिचे समर्थन करणे हे रिवायतीचा आग्रह धरण्याप्रमाणेच चुकीचे आहे. इथे मला माझा एक शेर आठवतोय:

**जदीदची चलती आहे तर**
**रिवायती गुंडाळून ठेवू**

रिवायती-जदीद ह्यांच्या खुणा समजून घेणे आपल्यामध्येच एक गुंतागुंतीची प्रक्रिया आहे. ह्या अर्थाने की रिवायती जदीदचा पेहराव घेऊन आली तर काय ? ही धोक्याची घंटा आहे की मराठी गझलेत एक नवी प्रवृत्ती उफाळून येत आहे ती म्हणजे अश्या गझल लिहिल्या जात आहेत ज्यांचे फ्रेमवर्क हे जदीद-स्वरूपाचे असते (जेणेकरून गझल जदीद आहे हा आभास निर्माण होतो), पण कन्टेन्ट रिवायती असतो. ह्या विषयी पुष्कळ काही समजून घेण्याची आणि पुढ्यात आणण्याची आवश्यकता आहे, ज्यासाठी गेल्या दशकातल्या गझलांचे अभ्यासपूर्ण आकलन झाले पाहिजे. हे अतिशय अवघड आणि बौध्दिक मेहनतीचे काम आहे. असो, हा काळ निश्चितच मराठी गझल-समीक्षेच्या सुरुवातीचा आहे, आणि हळूहळू का होईना ह्या पिढीचे एकूणच गझल-समीक्षेविषयीचे कुतुहूल वाढत आहे. आशा आहे की येणाऱ्या काळात समकालीनच्या ह्या प्रकल्पात अनेक सशक्त हात जोडले जातील.

समीर चव्हाण
कानपुर, २०२१

**संदर्भ सूची:**


१. गझल-परिवेश, परंपरा आणि अर्थवत्तेची साधने, अनंत ढवळे, समकालीन गझल, अंक २, २०१७

२. उर्दू पर खुलता दरीचा, गोपीचन्द नारंग, वाणी प्रकाशन, २००८

३. उर्दू ग़ज़ल एवं भारतीय मानस व संस्कृति, गोपीचन्द नारंग, भारतीय ज्ञानपीठ, २०१६

४. बज़्मे-ज़िन्दगी : रंगे-शायरी, फ़िराक़ गोरखपुरी, भारतीय ज्ञानपीठ, २०१४

५. मराठी ग़ज़ल: अर्धशतकाचा प्रवास, राम पंडित, साहित्य अकादमी, २०१४

६. मराठी समीक्षेची सद्य:स्थिती, वसंत आबाजी डहाके, पॉप्युलर प्रकाशन, २०११

## ज्ञानबोध आणि निर्मिती

## भाग पहिला

कवितेची अथवा कुठ्ल्याही कलेची मीमांसा करण्याचे काम सरळसोट नाही. एरवी होणारे ज्ञानार्जन आणि कलेतून होणारी निर्मिती असे दोन तौलनिक बिंदू घेवून ह्या संदर्भात विचार करता येईल का हे बघणे ह्या लेखाचा काहीसा उद्देश्य आहे. एका लेखातून हे पूर्णपणे साध्य होणारे नाही ह्याची मला जाणीव आहे. प्रश्न आणि समस्या मुळातून ओळखणे, हे त्यांची सोडवणूक करण्याइतपत अथवा त्याहूनही अधिक महत्वाचे असते असे इतर शाखांमधील संशोधन सांगते. बीजरूपाने काही महत्वाच्या संदर्भांची चर्चा करणे, महत्वाचे प्रश्न ओळखणे आणि त्यातून काही उत्तरांच्या शक्यता शोधता येतील का हे बघणे असा काहीसा हा प्रयत्न आहे. गझलेसारख्या विचारानुगामी साहित्यविधेच्या बाबतीत हे काम अधिकच जटिल बनते. इथे रचना हा एक अधिकचा घटक बनून उभा राहतो. गझलेच्या रीती बघताना, गझलेचे भौतिक, ठाशीव घटक आणि शब्दांमागची वैचारिक साधने असा दोन्ही अंगानी विचार करावा लागतो. गझलेची भाषिक, आकारिक साधने गझलेची 'रीती' घडवताना दिसून येतात; तर वैचारिक साधने ह्या रीतीच्या साच्यामधून कलेचे रसायन ओतून नवनिर्मितीचे , सर्जनाचे काम करत असतात. इथे अनेक गोष्टी आहेत - राग, लोभ, आवड , ऊन, सावली ह्यांसारखी संश्लेषणात्मक ( सिंथेटिक) वेदने (पर्सेप्शन्स) आहेत. या वेदनांमधून निर्माण होणाऱ्या भावना आहेत, त्याहूनही अधिक जटिल असे विश्लेषणात्मक (अनलिटिकल) विचार आहेत. एकूण इंद्रियाना जाणवणारे अनुभव आणि त्या अनुभवांचे सातत्याने होत जाणारे वैचारिक संकलन अशा संमिश्रतेची ही जमीन आहे. गोष्टींचा इंद्रियांद्वारे अनुभव येणे, त्या गोष्टी समजणे, आणि त्याही पलिकडे जाऊन गोष्टींमागचा अन्वयार्थ जाणवणे या तीनही प्रक्रिया सात्यत्याने अथवा खंडीत स्वरुपात होत असतात. वरकरणी 'लक्षात येणे ' ह्या एकाच घटनेसाठी या वेगवेगळ्या शब्दांची भाषेत योजना होण्या मागचे हे एक महत्वाचे कारण असावे.

विचाराच्या अंगाने जाणारी कविता निव्वळ भावनिक असू शकते का? भावनेच्या तळाशी देखील विचार आहेच. मुळात विचार हे व्यक्त होण्याचे वाहन आहे असे मानून चालल्यास ह्या प्रश्नाचे उत्तर होय असेच द्यावे लागते. विचार कसा व्यक्त झाला आहे ह्यावर कवितेची तथाकथित बाह्यता यशस्वी होते अथवा होत नाही. ह्या ' कसे' चे उत्तर अनेक अंगाने देते येते. शैली आहे, गझलेच्या बाबतीत मजमून-निगारी (ढोबळ मानाने एखादा विचारव्यूह अथवा बंध घेवून त्याचा विकास करणे) ह्या सारखा एखाद-दुसरा अधिक घटकदेखील आहे. मोठ्या

कवींकडे नव-नवे बंध निर्माण करण्याची हातोटी असते - निव्वळ विकास करण्याची नव्हे. मोठा कवी भाषेचे निर्माण करतो असे म्हटले जाते त्याचे हे देखील एक कारण आहे. उर्दू गझलेत शतकानुशतके मजमूननिगारीचे काम सुरू असल्याने तोच- तोचपणाचा कहर झालेला दिसून येतो. यात नवे मजमून (विचार-प्रतिमाबंध) न कल्पिता जुन्या कवींचे मजमून उचलून त्यावर बांधकाम करण्याचा प्रयास दिसून येतो. ह्या ठराविक गोष्टींचे साहचर्य मूल्य अधिक असते - म्हणजे 'सर्व' (देवदाराचे झाड - फारसी कवींनी प्रियकाराला सदाहरित देवदाराची उपमा दिली. नंतर शतकानुशतके हा मजमून अनेक कवींनी मोठ्या प्रमाणात वापरलेला दिसून येतो) हा मजमून आला की, त्याचा रेखीव डौलदारपणा, सौंदर्य आलेच. अत्यंत कमी शब्दांत कवीचे काम होवून जाते! क्वचित काही शेरात हे प्रतिमान बरे भासत असले तरी अतिरेकाने रसभंग होऊन जाताना दिसून येतो.

कवीने आपले विचार-प्रतिमाबंध (मजमून) स्वतः निर्माण केले पाहिजेत असे मला प्रकर्षाने वाटते. हे दरवेळी शक्य नसते, भाषा आणि कवितेच्या काही मर्यादा आहेत हे मी जाणून आहे, पण कवीची स्वतःची अशी अद्वितीय वैशिष्ट्ये कवितेला दरवेळी नव्याने उजाळा देत असतात. हा ताजेपणा कवितेचा प्रवाह वाहता ठेवतो, कलेला जिवंत आणि विकसनशील ठेवतो. जिथे नवेपण असते, तिथे एक प्रकारची अव्यवस्थादेखील असते. वरवर घडीव वाटणाऱ्या गझलेसारख्या कवितेच्या संदर्भात ही अव्यवस्था असहज वाटू शकते, पण ह्या अव्यवस्थतेच्या उलथा-पालथीमधूनच निर्मिती प्रक्रियेचे सौंदर्य पुढे येताना दिसून येते.

वरवर दिसणारे, बोचणारे वास्तव आणि मनातल्या संकल्पनांचे (आयडियाज) जग, या दोन अक्षांच्या भोवती विचारांची आवर्तने सुरू असतात. मात्र या वास्तवाचे देखील एकच एक वर्णन होऊ शकत नाही. मग ते निव्वळ वैयक्तिक स्तरावरचे वास्तव असो किंवा मानवी मनोव्यापाराच्या संभावनांचा (शक्यतांचा) अमर्याद भूमीपट. वास्तव काय आहे? ज्ञान कसे होते? विश्वाच्या व्यवस्थेमागे कोणती मूलभूत तत्वे आहेत? यांसारखे अनेक प्रश्न हजारो वर्षांपासून माणसाला पडत आलेले आहेत. या प्रश्नांची सोडवणूक करण्याच्या प्रयत्नातून दर्शनांचा आणि विद्याशाखांचा जन्म झालेला दिसून येतो. भौतिकशास्त्राचे नियम असोत किंवा तत्वचिंतनातले सिध्दांत, *काळ आणि अवकाश* यांना समजून घेण्याचे हे मानवी प्रतिभेचे विविध प्रयास आहेत. कवितेचा प्रयत्न देखील असाच काही आहे, पण त्याला मानुषी आयाम जोडले गेलेले दिसून येतात. (किंबहुना याही पुढे जावून, इतर शास्त्रे विकसित होण्याआधी कविता हा मानवी ज्ञानाचा स्त्रोत होता असे म्हणण्यास भरपूर वाव आहे. होमरच्या इलियड

आणि ऑडिसी या दोन महाकाव्यांना ग्रीकमधल्या अनेक शास्त्रांचा आधार मानले जात होते.) भाषा ही अर्थातच ह्या व्यवस्थांची आधारभूत व्यवस्था (सिस्टम ऑफ सिस्टम्स) असल्याने या तीनही शाखांमधे मला अनेक ठिकाणी साधर्म्य आणि समानता दिसून येते. अर्थातच रीतीच्या पातळीवर विद्याशाखांमध्ये जे हजारो भेद दिसून येतात ते इथेही आहेतच. महायान बौद्धांचे निर्भर अस्तित्व, द्वैतवाद्यांचे द्वैत, आरिस्टॉटल आणि डिमोक्रेटस ह्यांची प्रकाश आणि कणांविषयीची मते, आधुनिक भौतिकशास्त्रातल्या डूआलिटी आणि इंटर-कनेक्टेड स्पेस ह्या संज्ञांशी जवळीक दाखवतात. आईनस्टाईन ह्या द्वैतासंबंधी काय म्हणतो हे बघणे उद्बोधक ठरेल:

**"....असे वाटते की आपण कधी-कधी एकच सिद्धान्त वापरला पाहिजे, तर कधी दुसरा एखादा. ह्यातून एक नवी अडचण उभी राहते -ती म्हणजे वास्तवाची दोन परस्परविरोधी चित्रे; आणि यापैकी कुठलेही एकट्याने (निव्वळ स्वबळावर) प्रकाशाची घटना पूर्णपणे समजावून सांगू शकत नाही; एकत्रितपणे मात्र ह्या घटनेची संगती लावता येते. "**

तरंग आणि कणाचे द्वैत (वेव्ह अँड पार्टिकल ड्युआलिटी) हा सिद्धांत ह्या संदर्भात उद्बोधक आहे. पदार्थांमध्ये कण आणि लाट (तरंग) ह्या दोन्हींची वैशिष्ट्ये असतात. प्रकाश काही वेळा कण स्वरूप भासतो तर काही वेळा एखाद्या लाटेसारखा. ह्या घटनेला वैशेषिक दर्शनातले ‘अनध्यवसाय’ म्हणजे 'अनिश्चयात्मक ज्ञान' असेही म्हणता येईल.

विचार हे एक गतिमान संघटन आहे. मनाच्या अवस्थांची उभारणी आणि संचलन अशी दोन्ही रूपे विचाराच्या संदर्भात दिसून येतात. भौतिक अवस्थेमुळे येणारे विशिष्ट विचार आणि विचारांमधल्या गडदतेचा व्यक्तिपुरत्या भवतालावर होणारा परिणाम या दोन्ही घटना विचाराना धरून घडतात. मग विचार हे या अनुभवांचे कार्यस्वरूप प्रकटन आहे अथवा मूलभूत कारण असा प्रश्न उपस्थित होतो. या प्रश्नाची उकल कवितेच्या उलगडण्यातून होत जाते, किंवा कवीचा तसा प्रयत्न निश्चित असतो. विचार ही जाणीव, भावना, गरज, इच्छा इत्यादिंपेक्षा निश्चीत अधिक ठाशीव गोष्ट आहे. विचाराच्या रचनेत पडणारा कच्चा माल म्हणून या मूलभूत आणि अमूर्त गोष्टींकडे बघता येईल. भाषा, चिन्हे आणि विचारांच्या अभावात ह्यांचे अस्तित्व निश्चित असले, तरी असंप्रेषणीय आहे.

संशोधन पध्दती आणि विज्ञानाची प्रचंड प्रगती झालेली असली तरी अद्यापही एकूण मनोव्यापार सर्वतः समजणे आणि स्पष्टपणे संज्ञीकृत करणे कठीण आहे. हे भेद आपण आपल्या समजेनुसार आणि भाषिक साधनांच्या चौकटीतून करत जात असतो. विचाराचे बांधकाम बघितले, तर त्या खाली भाषेची भक्कम संरचना दिसून येते. विशिष्ट भाषा जाणणाऱ्यांचे विचार विशिष्ट पध्दतीने घडत जातात असे संशोधक सांगतात. या संरचनेत घड-बिघाड अर्थातच आहेत. माझ्या मनात आलेला हा एक विचार मी मराठीतून मांडतो आहे, त्याची पूर्व-भूमिका, मांडणी आणि उत्तर-भूमिका, यांवर अर्थात मराठीतून बोलण्याचा आणि विशिष्ट लकबीने गोष्टी मांडण्याचा प्रभाव पडलेला आहे, शिवाय माझ्या सध्याच्या मनोवस्थेचाही. मी किंचित रागात, आहे, उदास आहे अथवा आनंदी आहे ई. एकूण विचाराचा पोत ही एक लांबरूंद दरी आहे. भाषा ही चिन्हांची व्यवस्था मानली, तर भाषेचे प्रमुख काम विचार व्यक्त करणे ठरून जाते.

विचारांशिवात ज्ञान संभवत नाही, पण विचार हे सत्य अथवा असत्य नसतात, तर ते केवळ आकृतीरूपाने असतात. विचारांच्या आधीची मानवी मेंदूची अवस्था ही कोऱ्या पाटीप्रमाणे (ट्याब्युला राझा) असते; ज्यावर आपले अनुभव विचार लिहितात असे जॉन लॉक म्हणतो. हे मत अनुभववादाला धरून आहे. म्हणजे जन्मजात (सहजात) कुठलीही गोष्ट नसते, इंद्रियाना येणारे अनुभव हेच आपली मनोभूमिका बनवत असतात असे ढोबळ मानाने म्हणता येईल.

एकीकडे देकार्तचे सहजात ज्ञान , तर दुसरीकडे लॉकची ही अनुभववादी विचार धारा, अशी ही दोन विरुध्द टोके आहेत. सर्व ज्ञान केवळ आणि केवळ अनुभवातूनच मिळत जाते असा लॉकच्या मतांचा अर्थ बरेचदा घेतला जातो, तो मात्र योग्य वाटत नाही. काही ज्ञाने आणि कल्पना सहजात असतात असे देकार्तचे म्हणणे होते. पुढे नॉम चॉम्स्की यांनी देखील भाषेच्या संदर्भात काहीसा समांतर प्रमेय मांडलेला दिसून येतो. ह्या प्रमेयानुसार (मनोवाद) भाषेच्या संरचनेच्या मुळाशी असलेली तत्वे ही मानवी मेंदू मध्ये जनुकीय पातळीवर, जन्मजात उपलब्ध असतात. मनात बीजरूपाने पडून आलेल्या गोष्टींचा बोध नंतर कधीतरी वेगवेगळ्या कारणांनी होणे, ही गोष्ट *काही ज्ञाने सहजात असतात* ह्या सिध्दांताला दुजोरा देते. किंवा हे की, एकतर ही ज्ञाने सहजात असतात किंवा योग्य तो उद्दीपक मिळेतो निष्क्रिय अथवा सुप्तावस्थेत पडून असतात (उदा. उपजतच जाणीव असलेल्या भाषेचा योग्य वातावरणात विकास घडून येणे). गोष्टी वरवर समजणे आणि त्याच सर्वार्थाने जाणवणे यातला कदाचित हाच फरक असावा.

लॉकने अनुभवाचे वेदन आणि अंतरिक्षण असे दोन प्रकार सांगितलेले आहेत. त्याच्या मते कल्पना आणि त्यांचे परस्पर संबंध यांनी आपले समग्र ज्ञान बनलेले असते. प्रतिमा आणि वेदन या दोहोंना तो कल्पनाच (ideas) मानतो. इथे कल्पना म्हणजे विचाराचा विषय असा अर्थ घ्यावा - आयडियाज). आपण बघितलेली एखादी वस्तू म्हणजे ती वस्तू नसून त्या वस्तूची आपल्या इंद्रियांनी उभारलेली प्रतिमा असते. आपण जी विधाने करत असतो, त्या विधानांमागच्या संकल्पना इंद्रियानुभवातून बनत जातात असा अर्थ घेता येतो. अनुभववादाचे एकंदर स्वरूप वैज्ञानिक पध्दतीना पाठबळ देणारे आहे. मानवी ज्ञान आणि नीती ह्यांचे स्वरूप समजावून घेण्यात अनुभववादाने मोठा हातभार लावलेला दिसून येतो. वेगवेगळी वेदने आणि त्यातून निर्माण झालेल्या मानसिक प्रतिमा ह्यांच्या मालिका म्हणजे आपले अनुभव असतात असे डेव्हिड ह्यूम मानतो. त्याच्या मते कार्य आणि त्याचे कारण हे बुद्धिगम्य नसून अनुभवगम्य असते. त्याने मानवी वर्तनाच्या संदर्भात विवेकापेक्षा भावना / उत्तेजना (इथे पॅशन ह्या अर्थाने) ह्या अधिक प्रबळ असतात असे मानले होते. माणसाचे मन म्हणजे कुठलेही एकत्व नसलेला वेदनांचा पुंजका आहे (बंडल ऑफ पर्सेप्शन्स - वेदन) असे तो म्हणतो

**".... मी जेंव्हा माझ्या 'स्व' मध्ये प्रवेश करतो - तेंव्हा मी नेमका कुठल्या न कुठल्या वेदनाशी येवून अडखळतो - जसे की गर्मी वा थंडी, ऊन किंवा सावली, प्रेम अथवा द्वेष, पीडा किंवा आनंद. मला मी कुठल्यातरी वेदनाशिवाय कधी सापडतच नाही, आणि वेदनाखेरीज इतर काही मला दिसतही नाही. जेंव्हा ही वेदने माझ्यापासून काढून घेतली जातात, उदाहरणार्थ गाढ झोपेत असताना, (तेंव्हा) मी जणू काही अस्तित्वातच नसतो, मला माझी कुठलीही जाणीव नसते."** (इथे वेदन हा शब्द पर्सेप्शन या अर्थाने वापरलेला आहे; नेहमीच्या वापरात असलेल्या 'वेदना' म्हणजे पीडा, दु:ख या शब्दाहून वेगळा अर्थ घ्यावा.)

एकूण 'स्व' किंवा 'आत्म' ही संकल्पना अनुभवजन्य बोधनांखेरीज संभवत नाही. आपण म्हणजे आपल्या इंद्रियाना येणारे अनुभव आणि त्यांपासून अंतिमतः बनणाऱ्या संकल्पना असतो. इंद्रियाना आलेले अनुभव (इंद्रियगोचर ज्ञान) आणि त्या अनुभवाचा मानसिक आशय अथवा प्रतिमा हा मानवी कल्पनांचा कच्चा माल असतो. सहज काय आहे, आणि अर्जित काय आहे हा सहजवादी (विवेकवादी /नेटिविस्ट्स) आणि अनुभववादी (एम्पिरिअलिस्ट्स) ह्यांच्यातला काहीसा मतभेदाचा विषय असला तरी ही दोन्ही मते आपापल्या ठिकाणी योग्यच वाटतात. इंद्रियांना होत जाणारे दैनंदिन ज्ञान आणि बुध्दी व विवेकातून विकसित होत जाणारे विचारात्मक ज्ञान, ह्या दोन्ही गोष्टी ढोबळ मानाने स्वतंत्रपणे अस्तित्वात असतात असे मानणे

अगदीच अयोग्य ठरू नये. बुध्दी आणि विवेकामागच्या मूलभूत प्रेरणा आणि व्यवस्था काय आहेत हा संशोधनाचा विषय आहे.

कांटच्या काळात या दोन्ही मतप्रवाहांचा दबदबा होता. वरकरणी पूर्णतः विरोधी वाटणारी ही मते, एकीकडे धर्म आणि दुसरीकडे विज्ञान, या दोन टोकांमधल्या तत्कालीन पेचातून उद्भवली होती. कांटने त्याच्या क्रिटिक ऑफ प्यूर रिझन (शुद्ध बुध्दीची समीक्षा) ह्या ग्रंथातून, या मतांचे विश्लेषण आणि समन्वय साधण्याचा प्रयत्न केला. अनुभवातून मिळालेले पश्चातनुभवीय (अपोस्टिरिअरी) ज्ञान आणि अनुभवांच्या पलीकडे असणारे प्रागनुभवीय (अप्रिओरी) ज्ञान असे दोन प्रकार त्याने चर्चिले आहेत. कांटची ट्रान्सेंडेंटल आयडियालिझम (आध्यात्मिक चिद्वाद) ही विचारप्रणाली नैतिकता, सौंदर्यशास्त्र आणि तत्वज्ञान अशी सर्वत्र लागू होते. अर्थबोधासाठी कांटने चार प्रमुख वर्गांतर्गत बारा प्रकारच्या आकलन-कोटी सांगितल्या आहेत, त्या याप्रमाणे :

परिमाणसूचक (क्वांटिटी) - एकता (युनिटी), अनेकता (प्लूऱ्यालिटी), समष्टि (टोट्यलिटी ); गुणसूचक (क्वालिटी) - सत्ता (रिॲलिटी), नकार (निगेशन), ससीमता (लिमिटेशन); संबंधसूचक (रिलेशन) - विषयगुणसंबंध, द्रव्यत्व (इनहरंस , सबसिस्टंस), कारणता (कॉजॅलिटी), निर्भरता (डिपेंडंस), सामूहिकता (कम्यूनिटी); प्रकारता - (मोडॅलिटी): शक्यता - अशक्यता (पॉसिबिलिटी, इंपॉसिबिलिटी), अस्तित्व-अनस्तित्व (एक्झिस्टंस, नॉन-एक्झिस्टंस), अनिवार्यता आकस्मिकता (नेसेसिटी, कंटिंजंसी) .

ह्या आकलन-कोटींच्या माध्यमातून बाह्य जगाचा बोध होत असताना बुद्धी इंद्रियजन्य वेदनांमध्ये इतके बदल घडवून आणते की बाह्य वस्तूचे इंद्रियांना समजलेले स्वरूप आणि त्यांचे विवेक-बोधानंतर बनणारे आंतरिक स्वरूप हे अतिशय भिन्न असते. मागे म्हटल्याप्रमाणे वस्तूचे स्वरूप आणि त्या वस्तूची आपण बनवलेली मानसिक प्रतिमा या भिन्न असू शकतात. अर्थातच वस्तूंचे मोठ्या प्रमाणावर प्रमाणीकरण झाल्याने, तसेच छायाचित्रणातून मिळणाऱ्या संदंर्भांमुळे ह्या संकल्पनेत किती बदल झालेला आहे (किंवा अजिबात झालेला आहे का) हे बघणे उपयुक्त ठरावे.

कांटने या आकलन-कोटी ॲरिस्टॉटलच्या विचारांच्या पायावर उभ्या केलेल्या दिसून येतात. ॲरिस्टॉटलने ज्ञानाच्या कारणांबद्दल काहीसा असाच विचार केला होता. त्याच्या मते कशाचेही ज्ञान होणे म्हणजे त्या वस्तूच्या कारणांचे ज्ञान होणे होय. ह्यासाठी त्याने उपादानकारण,

आकस्मिककारण, हेतुकारण, आणि कर्तुकारण असे चार प्रकार कल्पिले होते. ह्या चार कारणांमध्ये पुढे सर्व पदार्थ अंतर्भूत होतात. भारतीय दर्शनांचा विचार करता वैशेषिकांनी ह्या संदर्भात सखोल चिंतन केल्याचे दिसून येते. वैशेषिकांनी अस्तित्वात असलेल्या आणि वर्गीकरण करण्याजोग्या सगळ्या वस्तूंना पदार्थ मानून त्यांचे द्रव्य, गुण आणि कर्म हे तीन प्रकार केले आहेत. ह्या द्रव्यांचे पुढे पृथ्वी, आप, वायू, तेज, आकाश ही पंचमहाभूते; काल, दिशा, आत्मा आणि मन असे नऊ भेद होतात. पैकी पंचमहाभूते ही इंद्रियगोचर/ अनुभवीय या प्रकारात मोडतात.  सजीवांमध्ये असलेली बहुतेक जैविक वैशिष्ट्ये ही पंचमहाभूतांपैकी कुठल्या न कुठल्या प्रकारात मोडतात.  पुढे गुणांचेही वैशेषिकांनी अनेक पोटप्रकार सविस्तर वर्णन केलेले दिसून येतात. त्यानी लौकिक विश्वाचे भाव आणि अभाव असे दोन विभाग सांगून ह्या दोन्हींचे प्रकार केले आहेत. पैकी भावाचे द्रव्य, गुण, कर्म, सामान्य, विशेष आणि समवाय; तर अभावाचे प्रागभाव, प्रध्वंसाभाव, अत्यंताभाव आणि अन्योन्याभाव हे भेद आहेत. एखाद्या वस्तूचे नसणे, म्हणजे अभाव होय. कार्य उत्पन्न होण्याआधीचा अभाव म्हणजे प्राग-अभाव, कार्य नष्ट झाल्यानंतरचा अभाव म्हणजे प्रध्वंसाभाव, तीनही काळात सवर्था अभाव सणारे कार्य म्हणजे अत्यंताभाव; तर एका प्रकारच्या वस्तू मध्ये दुसऱ्या प्रकारच्या वस्तूचा अभाव म्हणजे अन्योन्याभाव. हा लेख मुळात कवितेसंबंधी असल्याने दर्शनांसंबंधी अधिक बोलणे उचित ठरणार नाही, पण वैशेषिक दर्शनांमधली वैज्ञानिक दृष्टी विलक्षण थक्क करून सोडणारी आहे. वैशेषिक मतांचा उहापोह करण्यासाठी स्वतंत्र लेख लिहावा लागेल.

एकूण मानवी बुद्धीस ज्ञान कसे होते ह्यासंदर्भात मीमांसकानी सखोल चिंतन केल्याचे दिसून येते. कवितेतून अथवा इतर ललित कलांमधून ज्ञान होण्याची प्रक्रिया मात्र कमालीची मुक्त आहे. ह्यात कुठलीही विशिष्ट रचना दिसून येत नाही - उलटपक्षी अशा रचनांच्या चौकटी मोडण्याकडेच कवींचा कल दिसून येतो. कवितेतला अर्थबोध, कवीचा  निर्मिती- विषय आणि विचारांचा एकूण पट अतिशय विशाल असतो. विचारांच्या गतीने कवितेतल्या विधेयांचा प्रवास सुरू असतो. मनातील आंदोलने, शुद्ध बुद्धी (प्यूर रिझन) आणि व्यावहारिक बुद्धीमधला (प्रॅक्टिकल रिझन) संघर्ष, शब्दांची संहती - विरलता, संदर्भांचे, प्रतिमांचे बांधकाम, आठवणी, अनुभव, परानुभव अशा अनेक गोष्टी सांगता येतील.  इंद्रियाना आलेले अनुभव आणि बुद्धीग्राह्य ज्ञान ह्या पलिकडचे काही ज्ञान अथवा बोध, हा कलांच्या निर्मितीमागचा मूळ स्त्रोत असावा असे म्हणावेसे वाटते. कांटच्या पुर्वानुभवीय आणि पश्चातनुभवीय ज्ञानांसोबत मला सर्जन ज्ञान (क्रियेटिव कॉग्निझंस) असा तिसरा घटक जोडावासा वाटतो. हे सर्जन ज्ञान वेगळे नसून बुध्दीग्राह्य अप्रियोरी (अनुभव येण्याआधीचे सहज ज्ञान) ज्ञानच आहे असा ह्यावर प्रतिवाद केला जावू शकतो, पण शुध्द बुध्दीची विचार करण्याची तर्कसंगत पद्धत आणि कलेच्या रीतींमध्ये

मूलभूत फरक दिसून येतो. प्रातिभिक उत्कर्ष ही या सर्जन ज्ञानाची पुढची अवस्था मानता येईल. कांटचे मत मात्र वेगळे आहे. तो सौंदर्य आणि कला यांना बोध न मानता अभिरुचीचा निर्णय मानतो. कल्पना आणि आकलन ह्यांमध्ये एकत्व साधणारी शक्ती म्हणजे त्याच्या मते प्रतिभा होय.

आपले सर्व अनुभव हे स्थल (स्पेस) आणि काल (टाईम) या दोन आकारांमध्ये घडून येत असतात असे अनुभववाद सांगतो. कविता मात्र स्थल आणि काल या दोनही आकारांना छेदून पुढे जाताना दिसून येतात. निर्मितीच्या अवस्थेतले हे सर्जन ज्ञान नेमके कसे कार्य करते हे सांगणे कठीण आहे, मात्र, निर्मित कलेचा अभ्यास करून त्या संदर्भात काही आडाखे बांधता येणे शक्य आहे. एकंदर सापडण्याआधी हरवण्यासारखी ही काहीशी प्रक्रिया आहे.

**उसे ढूंडते मीर खोये गये**

**कोई देखे इस जुस्तजू की तरफ**

(मीर तकी मीर)

लिहिणाऱ्याचा विलय ही एक विलक्षण अवस्था आहे. या अवस्थेला शब्दबद्ध करण्यासाठी वेड, जुनून, बेखुदी, शौक, बेखबरी, ट्रांस, भान (अथवा भानाचा अभाव) असे विविध भाषांमधले बंध कवींनी योजले आहेत. व्यावहारिक बुध्दीला न समजणाऱ्या, न जमणाऱ्या असीम कल्पना कवीच्या ह्या प्रातिभिक विलयातून जन्म घेत असतात. विलयातून आकार निर्माण होण्याची ही घटना मोठी मनोरम आणि तितकीच आश्चर्यकारक असते.

(क्रमशः)

अनंत ढवळे

हर्डंन, व्हर्जिनिया

२०२०/२१

**संदर्भ सूची:**

१. https://plato.stanford.edu/entries/locke/

२. https://plato.stanford.edu/entries/categories/

३. https://plato.stanford.edu/entries/self-knowledge/supplement.html

४.https://mr.wikipedia.org/wiki/%E0%A5%B2%E0%A4%B0%E0%A4%BF%E0%A4%B8%E0%A5%8D%E0%A4%9F%E0%A5%89%E0%A4%9F%E0%A4%B2

५. The Evolution of Physics: The Growth of Ideas from Early Concepts to Relativity and Quanta., Albert Einstein ; Leopold Infeld (1938)

६. इमॅन्युएल कांट, मे. पुं रेगे, https://vishwakosh.marathi.gov.in/16255/

७. ज्ञानमीमांसा (Epistemology),, प्रदीप गोखले, https://marathivishwakosh.org/45886/

८. फ्रांसिस प्रिचेट ह्यांचे विविध लेख

## मोहिश भामरे

### १

आठवत जायचे तुझे डोळे
दूरवर न्यायचे तुझे डोळे

काय होते तुझ्या मनामध्ये
का डबडबायचे तुझे डोळे

काय माझ्याकडे असे होते
काय मागायचे तुझे डोळे

जायची वेळ व्हायची माझी
ओलसर व्हायचे तुझे डोळे

पाय निघता निघायचा नाही
वाट अडवायचे तुझे डोळे

काय माझ्याकडे असे होते
काय मागायचे तुझे डोळे

जायचो मी बुडून नाहीतर
हात सोडायचे तुझे डोळे

काय वर्णेल चेहरा कोणी
त्यात चमकायचे तुझे डोळे

## २

किती डोळे ढगांवरती किती बेटातले पाणी
किती सांभाळते ओंजळ किती हातातले पाणी

किनारा पाहिला आणिक पुन्हा फेसाळली आशा
परतले व्हायला लाटा तिच्या-माझ्यातले पाणी

कधी लागेल काठाला निरर्थक वाहणे माझे
कधी होईल पूर्वीगत तुझ्या डोहातले पाणी

तिही जाते परत पाहत जुन्या नजरेतला ओढा
मलाही रोखते माझ्या नव्या डोळ्यातले पाणी

निराशेने तडे गेले मनाला न्यूनगंडाचे
खडे टाकूनही आले न वर माठातले पाणी

जराही बोलवत नाही स्वतःचे सांगणे मोहिश्
कळेना नेमके जाते कुठे अंगातले पाणी

**३**

गंध मातीचा नभामध्ये
आस भेटीची मनामध्ये

दूर असलेले बरे डोंगर
मी बरा माझ्या जगामध्ये

रंग दुःखाचा तुझ्या गेला
ऐन जगण्याच्या उन्हामध्ये

वेगळे काहीतरी आहे
काय आहे आपल्यामध्ये

छान दिसतो चांदणीचा त्या
व्ह्यूव माझ्या अंगणामध्ये

कोण तापाने बिघडली चव
राहिला ना रस कशामध्ये

लागतो अंधार वाटेवर
या उजेडांच्या वनामध्ये

## ४

जगणे पाणी वाटत गेले नंतर
दुःख तळाशी साठत गेले नंतर

एकांताला ग्रहण लागले आधी
फार एकटे वाटत गेले नंतर

आयुष्याला ऊन लागले थोडे
बरेच काही आटत गेले नंतर

सुरुवातीला जमले होते नाटक
श्वास उराशी दाटत गेले नंतर

खोल स्वतःच्या जे जे उतरत गेले
ते ते उंची गाठत गेले नंतर

जिथे कुठेही झूम जरा मी केले
तिथेच सगळे फाटत गेले नंतर

मुद्दा एका सेकंदाचा होता
दिवस खुलासा मांडत गेले नंतर

जगावेगळे स्वप्न पाहुनी सारे
जगासारखे वागत गेले नंतर

**मोहिश् राज भामरे**

**राहूल गडेकर**

**१**

मला सुचेनाशा झालेल्या सांज क्षणांचे चिंतन लिहितो
अर्थहीन तर कुणास वाटे मी अतिशय आशयघन लिहितो

मूळ कथा ही त्याची आहे कथेस जो ह्या जगून गेला
मी तर नुसते मिळत्या जुळत्या शब्दांचे आवर्तन लिहितो

प्रवास नक्की घडेल जेव्हा घडायचा आहे पायांना
बसल्या जागी माझ्या नावे मीच दिशांचे प्राक्तन लिहितो

कुणी मुळांवर, पानफुलांवर; माती, पाण्यावरही लिहिले
माझे वेलीवर असलेले.. मी केवळ अवलंबन लिहितो

नको तेवढी फरफट झाली माझ्या काही होकारांनी
समजत नाही मन नसतांना कशामुळे अनुमोदन लिहितो

हात दिला नवख्याला आधी नंतर त्यांनी पाय ओढला
पाय ओढणाऱ्यांचे खाली मी कायम प्रोत्साहन लिहितो

या काठाचे त्या काठाला पोहचेल ह्या आशेवर मी
वाहत जाणाऱ्या पाण्यावर काळाचे आक्रंदन लिहितो

डोक्यावर घ्या किंवा तुडवा पायांनी माझ्या शब्दांना
आपल्याच ह्या जगण्याचे मी हुबेहूब अवलोकन लिहितो

कोणी जंगल, कोणी हरीण कोणी काठाविषयी लिहिले
मी डोहाच्या खोल तळाचे नितळ नितळ संवेदन लिहितो

उगाच गर्दी आतुरतेने ऐकण्यास जमलेली नाही
अस्थिर त्यांच्या मनस्थितीचे मी उत्तम संगोपन लिहितो

## २

व्यस्त स्वतःला ठेवत आहे बिनकामाच्या कामांनी
आज स्वतःला मारत आहे हाक अनामिक नावांनी

पदर पकडता आला नाही कधी बरोबर अर्थाचा
अर्थ लागला समजू तेव्हा क्रम पालटला शब्दांनी

मर्यादांच्या वेढ्यांमधले दिवस बरे होते आधी
वाट लावली स्वतःच अपुली वेढवून पर्यायांनी

सुटला पट्टा तोंडाचा की ह्या दुनियेचे मालक ते
त्यांच्या नाका खालून सदा जोर पकडला चर्चांनी

तिला आठवत असेलही का भेट राहिली शेवटची
एक आठवण वाट पाहते चिंच भारल्या हातांनी

जीव ओतला एकूण एक पान भरवतांना आधी
नंतर सुकला पाचोळाही खेळवला पारंब्यांनी

लिहण्यापेक्षा फिरत राहतो अरण्य एकांताचे मी
मना आतले कंपन टिपले पानांवर रातकिड्यांनी

माझ्यामध्ये मूर्ख केवढे मला माहिती नाही पण
मिळून ओळख मला दिलेली माझ्या मधल्या मूर्खांनी

## ३

त्या जागेचे कानकोपरे चितारू नको
सर्व चालले परस्पर कुठे विचारू नको

कसे ओढले इच्छेविरुद्ध स्वतःस कोणी
कुण्या हयातीवर प्रश्नचिन्ह उभारू नको

साचेल पुन्हा वाईट स्थिती अपुल्यावरती
धूळ झटकल्यासारखे अता झुगारू नको

आगीला पाण्याची भीती कायम राहो
भय सारे ह्या जीवनातले निवारू नको

वाटत अपुला नसून सुद्धा अपुला आहे
ह्या काळाचा बिथरलेपणा नकारू नको

मार जिथे लागायचा तिथे लागत नाही
हात आरशावर चुकूनही उगारू नको

## ४

खूप गर्दी असून एकाकी
भर दुपारीच ऊन एकाकी

भिस्त सांभाळली तरीसुध्दा
खांब तंबू धरून एकाकी

वाट निर्जन दुरून येणारी
पार नुसता बसून एकाकी

पाठ फिरवून बैसला पर्वत
धार संतत पडून एकाकी

दुःख सल आठवण उदासीही
सोबतीला असून एकाकी

एकटे वाटते प्रकर्षाने
धृवतारा बघून एकाकी

प्रार्थनेला उगाच बसलो मी
वाटले मग अजून एकाकी

ओळ खोडून ती वही भरते
मी स्वतःला लिहून एकाकी

**राहूल गडेकर**

## अमोल शिरसाट

### १

छताकडे उघड्या डोळ्यांनी पाहत जगणे
कठीण असते श्वास शेवटी मोजत जगणे

दिवस रोजही लोटत नेतो कसाबसा मी,
संध्याकाळी सुने सुने रेंगाळत जगणे

जे जे देते त्याची किंमत वसूल करते
कुठे कुणाला देते काही सवलत जगणे?

एक प्रवासी उतरुन जातो दुसरा बसतो
कधीच नाही कोणासाठी थांबत जगणे

या दुनियेची नजर बोचरी छळत राहते,
तिच्या नशिबी फक्त पदर सांभाळत जगणे

सुखदुःखाच्या भोवऱ्यात मी निश्चल होतो
फक्त एवढ्यासाठी झाले शाश्वत जगणे

### २

व्यर्थ शब्दांचाच भारा वाढला
आशयाचा कोंडमारा वाढला

ठेवले होते जिभेला मोकळे
फक्त ओठांवर पहारा वाढला

राहिली नात्यात बस उपयोगिता
शुद्ध प्रेमाचा घसारा वाढला

शिंपडू का प्रेम थोडेसे पुन्हा
आत द्वेषाचा निखारा वाढला

पेटलेले रान आहे भोवती
काळजी घे फार वारा वाढला

ज्या ठिकाणी मी कमी पडलो जरा
नेमका तेथेच मारा वाढला

**३**

चार भिंती एक छप्पर रोजचे
जीवघेणे प्रश्न शंभर रोजचे

फार आवडते तरी; कंटाळलो
हे नको लावूस अत्तर रोजचे

तोच असतो प्रश्न माझा रोजही
तू नको देऊस उत्तर रोजचे

फार आवडतात का अश्रू तुला?
मी करू का दुःख सादर रोजचे?

मान धरते भूत दिवसांचे जुन्या
आणि करते प्रश्न नंतर रोजचे

नेसते ती भरजरी ओठी हसू
टोचते आतून अस्तर रोजचे

**४**

हा जुना वाचू नको पाढा कधीही
यापुढे भेटू नको आता कधीही

जन्मतो अन् रोज मरतो फक्त आपण
होत नाही काळ म्हातारा कधीही

आतल्या भेगाळल्या आहेत भिंती
हा पडू शकतो जुना वाडा कधीही

लागले आहे ग्रहण नजरेस बहुदा
सूर्य असतो का असा काळा कधीही?

दे पहारा जागता आधी स्वतःवर
तू तुला देशील गुंगारा कधीही

राबते आई तुला दप्तर मिळाया
तू नको चुकवू अशी शाळा कधीही

**अमोल शिरसाट**

## सारंग पांपटवार

### १

काय करावे करुन माझा प्लॉट रिकामा आहे
सगळे काही असून माझा प्लॉट रिकामा आहे

किती नेमले दलाल तरिही सौदा झाला नाही
कुणी तरी द्या विकून माझा प्लॉट रिकामा आहे

ऐपत नाही दुनियेची की अवाजवी दर माझे
काय असावे म्हणून माझा प्लॉट रिकामा आहे

समोर रस्ता सुंदर त्यावर कवितेचा गुलमोहर
रहा तुझे घर करून माझा प्लॉट रिकामा आहे

लाखो घरे उभारुन गेली एका क्षणात दुनिया
हयात मी गुंतवून माझा प्लॉट रिकामा आहे

कितीक आल्या मनात आणिक क्षणात उतरुन गेल्या
डीग्री झाली अजून माझा प्लॉट रिकामा आहे

पाहत असतो चढताना तोरण दारावर त्याच्या
कन्हतो मग हळहळून माझा प्लॉट रिकामा आहे

## २

उरले नाही कुणालाच रंगांचे कौतुक
जिकडेतिकडे चाललेय सरड्यांचे कौतुक

बघायला गर्दीला गर्दी जमली आहे
टाळ्यांना उरले आहे टाळ्यांचे कौतुक

कला हरवली हळूहळू मूर्तीकाराची
करत राहिलेलो आपण साच्यांचे कौतुक

सुरी म्हणू तलवार म्हणू की चाकू खंजिर
सांग करू मी कसे तुझ्या डोळ्यांचे कौतुक

भरगर्दीतुन नेले गेले सोने नाणे
बघणाऱ्यांना मावेना चोरांचे कौतुक

स्वतःस एका खोलीमध्ये बंद करून बघ
नसेल जर का तुला तुझ्या श्वासांचे कौतुक

प्रेमाचे वय विरहाचे भय मागे पडले
वाटत नाही आता आभासांचे कौतुक

काही हुशार होते ते ही वेडे झाले
करत राहिले वेडे मग वेड्यांचे कौतुक

पुन्हा निघाले नवीन दिवसांचे गाऱ्हाणे
पुन्हा वाटले मला जुन्या दिवसांचे कौतुक

तुला पाहिल्यावरती वाटत असते केवळ
तुला घडवणाऱ्या सुंदर हातांचे कौतुक

देणे नाही घेणे नाही उगाच अपुले
ह्यांना ह्यांचे कौतुक त्यांना त्यांचे कौतुक

**३**

भेटले दुःख प्रेम केल्याने
लावले वेड त्याच दुःखाने

फार नाही मजा अता उरली
व्हायचे तेच होत गेल्याने

लागले आवडायला पुस्तक
आणि उरलीत मोजकी पाने

बघत होते मला तुझे डोळे
भिजत होती उदासली राने

काय होईल यापुढे अपुले
फार थकलोय या विचाराने

खूप मोठे कपाट आहे मन
त्यास कप्पे किती किती खाने

येत नाहीच ती असे नाही
जाग येतेच.. पण उशीराने

का तुला तो हवा हवा झाला
काय केले असे तरी त्याने

सुटत गेल्या बऱ्याचशा गाठी
आपली एक गाठ जुळल्याने

मी मधे आणि भोवती पाणी
काळ सरकवत राहिला पाने

## ४

वेळ देते आणि आवड देत नाही
जिंदगी घालून सांगड देत नाही

मी जराशी ओल आहे पापणीची
जी कधी वाचाळ कोरड देत नाही

घाबरत असतो विचारत प्रश्न मी ही
उत्तरे ती ही धडाधड देत नाही

पंख देतो मोकळे आभाळ देतो
देव काही फक्त फडफड देत नाही

एक ही, मेसेजवर मेसेज करते
एक ती, रिप्लायही धड देत नाही

**सारंग पांपटवार**

**सुशांत खुरसाले**

**१**

माझ्या शेजारी बसणारा मुलगा
कधी एवढी दंगामस्ती शिकला

कोणाच्या डोळ्यांवर आलो नाही
आम्ही सगळा प्रकार गुपचुप केला

जावेसे वाटत आहे  मग जा की
सरकवून घे पण जाताना पडदा

एका प्रश्नाचे उत्तर देताना
समोर आल्या नवीन काही चिंता

स्वत:तल्या गांभिर्याला मी म्हणतो
माझ्यामधला भाग सोड गमतीचा

आज कशी ही मनात ठिणगी पडली
आज लागली तार कशी तारेला

म्हटले तर कसलीही फिकीर नाही
म्हटले तर हा भार उभ्या विश्वाचा

उजळवतो अद्याप एक कोनाडा
क्षीणपणाने दिवा जळत असलेला

माझी यात्रा इतकी मोठी नव्हती
माझा थकवाही मर्यादित होता

२

चालण्याचा अर्थ सापडला तरी
राहतो मागेच एखादा तरी

ही निरामयता खरी तर वाटते
येत आहे का असा थकवा तरी

आपले सुकणे अटळ होते म्हणा
काढला शोधून ओलावा तरी

एकतर कायम इथे रमशील तू
वा सतत येईल कंटाळा तरी

तू कुठे केलीस माझी वंचना
मी कुठे केला तुझा धावा तरी

त्या कृतीला अर्थ नव्हता फारसा
फुंकला वाटेत पाचोळा तरी

आपले संबंध मूर्तीसारखे-
तोडले पण राहिला साचा तरी

**३**

गोष्ट ती होती, कशी होती, बघत होतो
संगती लावून घटनांची बघत होतो

भूतकाळाची अनागोंदी दिसत होती
डायरीमधल्या जुन्या नोंदी बघत होतो

काय आहे पाहतो मी, हे कळत नव्हते
काय ही माझी अवस्था मी बघत होतो

ते शहर अगदीच खात्रीचे कुठे होते
मी घरे कित्येक शंकांची बघत होतो

व्हायला सामील नव्हतो पात्र मी बहुधा
मग कथा लांबून सगळ्यांची बघत होतो

चाललो होतो जणू पाडायला नाटक
भूमिका घेऊन टोकाची.. बघत होतो

एक तो बाजार होता कैक गोष्टींचा
फक्त मी घेऊन का धास्ती बघत होतो

कल्पनांची आपल्या बांधून गाठोडी
लोक सारे परतले गावी  बघत होतो

**४**

काय प्रत्यक्षात घडले, काय प्रत्यक्षात घडण्यासारखे आहे
आपले असणे इथे अगदीच एखाद्या रहस्यासारखे आहे

वाटते आहे सतत की आपल्या लक्षात काही येतही नाही
आणि जे लक्षात येते ते कुठे लक्षात घेण्यासारखे आहे

फारतर देईन माझी अर्धवट ओळख तुला पटवून मी नक्की
याउपर कोणी कुणाला काय द्यावे, काय देण्यासारखे आहे

सर्व जागा ह्याच जागेसारख्या आहेत इतके समजले आहे
आणि हे समजूनसुद्धा वाटते की विश्व फिरण्यासारखे आहे

संभ्रमांची लाट माझा भिजवते घोटा तसे मी मिटवतो डोळे
मी कशाला ह्या किनाऱ्यावर उभा आहे न कळण्यासारखे आहे

**सुशांत खुरसाले**

**विश्वजीत गुडधे**

**१**

गृहीतकांनी निष्कर्षाला आलो झटपट
तथ्यांनी तर झाली असती केवळ फरफट

माझ्यातर्फे बोलायाला समोर असते
पिच्छा माझा सोडत नाही माझी चौकट

कलेकलेने सर्व हातुनी निसटत गेले
हाती उरली केविलवाणी आदळआपट

टिकेल कुठवर याची काही खात्री नाही
एकाएकी झाला आहे कायापालट

वाऱ्यानेही उगाच माझे कान फुंकले
रक्तामध्ये भिनू लागली होती घुसमट

अशाचसाठी चर्चेला मी नाही म्हणतो
मुद्द्यावरती येता येता होतो कडवट

काय आणखी व्हायचे इथे बाकी आहे
किती आणखी होऊ शकतो आपण बोथट

## २

प्रश्न हा नव्हे की बुडलो वा तरलो आहे का
प्रश्न असा की घराबाहेर पडलो आहे का

याच्या त्याच्या चुकांना किती वाचत बसलो पण
स्वतःच्या तरी चुकांतून धड शिकलो आहे का

काळजी कशी वाटत नाही मागे पडण्याची
मी शेवटच्या बाकावरती बसलो आहे का

येऊच नये आता कुठल्या हाताने इथवर
आठवणींच्या मलब्याखाली दबलो आहे का

काय खुबीने एक लख्खसा हुंदका दाबला
काळोखाचा मित्र वगैरे बनलो आहे का

**विश्वजीत गुडधे**

## चैतन्य जोशी

### १

वणव्याला अर्पण केलेली वनराणीची बाग बघू
नंतर धरणीच्या डोळ्यांतिल धगधगणारी आग बघू

तुमच्याकडचा प्रलय पाहिला आता अमुचा भाग बघू
महापुराच्या डोळ्यांनी चल दुष्काळाचा नाग बघू

चंद्रालाही ग्रहण लागते सुखदुःखाचे कधीकधी
चंद्र समजण्यासाठी आधी चंद्रावरचे डाग बघू

कृष्ण राम अथवा बुद्धाच्या मार्गास लागण्यापूर्वी
राधा-मीरा,सीतेचा अन् यशोधरेचा त्याग बघू

जगावेगळे स्वप्न तुझे जर जगावेगळे यत्न हवे
अनवट वाटा अन् वळणांनी काढ यशाचा माग बघू

शुद्धीवर असताना सुद्धा पेंगत असतो दिवस तुझा
दोन पेग लावून नव्याने तुज येते का जाग बघू

रसिकत्वाची नजर पाहिजे व्यथा साजिऱ्या दिसण्याला
कवितेच्या खांद्यावर बसूनि दुनियेचा वैताग बघू

अठ्ठावीस युगांचा आहे लळा कालचा नाही हा
दिसेल पंढरपूर तुलाही तू चालाया लाग बघू

## २

प्रश्न सोपा अन् सहज उत्तर किती
मग तरी होते तुझी थरथर किती

प्रश्न बापालाच त्याचा थेट हा
वाटणीमध्ये मला वावर किती

मी जसा झालोय पदवीधर, तशी
लागली आहे मला घरघर किती

होत आहे पानगळ इकडे पहा
दाटला तिकडे पहा मोहर किती

पेग भरला आठवांचा मी तुझ्या
सांज बघ झाली पुन्हा कातर किती

वाढला कडवटपणा नात्यात या
पेरली होतीस तू साखर किती

पाहिले डोळ्यांत मी पाणी तुझ्या
फोडला दगडास मी पाझर किती

**३**

एक वेदना आत खोलवर रूजली आहे
एक त्यातुनी कविता छान उमलली आहे

चराचरावर अनुरागाची धुंदी आहे
मलाच वैराग्याची इंग्ळी डसली आहे

परिचयाचे कुणीच नाही या बेटावर
योग्य दिशेला नाव तुझी भरकटली आहे

आठवणींचे भळभळणे का थांबत नाही
कुणी काढली काळावरची खपली आहे

वेळ, काळ, संदर्भ अचानक बदलत गेले
माझ्या हाती फक्त पिपाणी उरली आहे

ती असताना शहर किती गजबजले होते
ती गेल्यावर गल्लीही शिणवटली आहे

काळोखावर स्वप्न नव्याने पांघरल्यावर
रात्र अताशा केविलवाणी निजली आहे

**चैतन्य जोशी**

## स्वप्निल शेवडे

### १

कठीण आहे हे समजावत बसणे
तडजोडी वाचून साधले नसते

मी तत्वांना धरून चालू बघतो
आणि काळ दामटतो त्याचे घोडे

अशा ठिकाणी आलो आहे आता
फोन तुला करणे ही अवघड झाले

भिंतीवर चढवून बघितला टीव्ही
खिडक्यांचे बदलून बघितले पडदे

काय करू हा गॅलरीतला कचरा
मेमरीतले फोटो काय करावे

मी डोक्याने नवीन वाट निवडली
माझे डोके नव्हते माझे डोके

गोष्ट तशी साधीच वाटली होती
साधे वाटत होते आधी दुखणे

## २

कुठे टाकून जाऊ अडचणी मी
कधीची धूत बसलो ही धुणी मी

असा पाऊस ही वैतागवाडी
किती पाहून बसलो वळचणी मी

किती करणार डोकेफोड शेवट
कराया घेतली वाखाणणी मी

ठरवतो कार्य मी माझे स्वतःशी
स्वतः मग फिस्कटवतो बोलणी मी

तुला माहीत आहे सर्वकाही
करुन करणार कुठली मागणी मी

कसे मोहात पाडू नोकरीला
कितीवेळा करू वेणीफणी मी

कळू नाही दिले काही कुणाला
तुझी ओढून पडलो ओढणी मी

बघत पंख्याकडे बसलो कधीचा
करत आहे कशाची आखणी मी

मला तू वाटली होतीस स्वप्निल
तुला का वाटलेलो धोरणी मी

**३**

कशाचे दुःख ही अस्वस्थता कसली
जपत बसलोय मी ही खिन्नता कसली

जणू कापूस कोंड्याची कहाणी ती
तिला सुरवात कसली सांगता कसली

पुढे मातीच होती पण तरीसुद्धा
खपत आयुष्यभर मी शक्यता कसली

कुठे अप्रूप गेले धावण्यामधले
मला वेढून बसली धन्यता कसली

करत आहेस नक्की काय आतमध्ये
तुझ्या खोलीत आहे शांतता कसली

उगाचच आत डोकावून बघतो मी
भयानक भासते ही रिक्तता कसली

**४**

जोरजोरात शांत  बसलो मी
आतल्या आत शांत  बसलो मी

काय केले नि काय काय करू
ह्या विचारात शांत  बसलो मी

विसरलो तीच आडवी आली
आठवत जात शांत बसलो मी

वाट पाहत मनात नसताना
टाकुनी कात शांत बसलो मी

डोलवत मान करत हो ला हो
बघत डोळ्यांत शांत बसलो मी

काय वाटेल ओळखीच्यांना
ह्याच नादात शांत बसलो मी

विविध केले प्रकार योगाचे
फक्त कामात शांत बसलो मी

चारचौघांत चार चौघांगत
ह्या प्रकारात शांत बसलो मी

जीवनाचा दिवा दिलास मला
हरवुनी वात शांत बसलो मी

**५**

नोकरी छा छू जरी होती
जगवण्या इतपत बरी होती

चित्र ते होते निसर्गाचे
वाचले तर शायरी होती

मी तिला भेटायला गेलो
शांतताही चाभरी होती

हातचालाखीच ठरली ती
जी कधी जादूगरी होती

फक्त नावालाच ओ बाकी
ओढ ही केंव्हातरी होती

चार अनुभव यायच्या आधी
गरज थोडी लाजरी होती

शिकत होतो अलिफ बे पे ते
पे वरुन तेंव्हा परी होती

लाज नव्हतो प्यायलो कोळुन
खूप तेंव्हा तरतरी होती

**स्वप्निल शेवडे**

**सागर प्रकाश**

**१**

आषाढ लागल्यावर वाजे मृदुंग कानी
पेरून रान होता येतो अभंग कानी

हातात टाळ घ्यावे नामात दंग व्हावे
जमताच फडकरी ते भजनास रंग रानी

दारात पालखी मग येईल माऊलीची
वारी करावयाचा बांधील चंग मानी

येईल जीवनी जे भोगून दु:ख घ्यावे
अन् साकडे विठ्ठलाला गाऊ श्रीरंग गानी

भेटीस ओढ लागे  'सागर' करी विनंती
होता कृपा प्रभूंची मिळणार संग ज्ञानी

**प्रकाश रामचंद्र क्षीरसागर**

## बाळ पाटील

### १

देवाचाही रावा केला आम्ही
भक्तीचा देखावा केला आम्ही

त्यांचे सोडा,ते तर परके होते
अपुल्यावरती कावा केला आम्ही

नियमा सोडुन कोण्या वळनी आलो
उजवा होता,डावा केला आम्ही

आता जिकडे तिकडे दानव झाले
शांतीचा तेरावा केला आम्ही

केव्हाची मानाने डौलत होती
त्या काठीचा पावा केला आम्ही

## २

मागे जयजयकार चालला आहे
चौखांद्यावर स्वार चालला आहे

वाटेलाही लाज वाटली थोडी
या वाटे तो फार चालला आहे

आप्तांनाही रान मोकळे झाले
कंठाने मल्हार चालला आहे

जाळ्यामधुनी मुक्त जाहला 'तो'ही
केवळ हा उपचार चालला आहे

होवो अथवा काकस्पर्श ना होवो
या पिंडातुन पार चालला आहे

भाळी त्याच्या भस्म रेखिले होते
सरणावर संस्कार चालला आहे

भिंतीचा आधार चालला आहे
ओट्यावरचा भार चालला आहे

**बाळ पाटील**

## जयंत कुळकर्णी

### १

संपला हा एक प्याला की बघू
रात्र गेली दिन निघाला की बघू

भरवसा माझाच थोडासा मला
एकदा तोही उडाला की बघू

कबर ती होती रिकामी; झोपलो
आतला तो परत आला की बघू

आग्रही नास्तिक तसा नाहीच मी
चांगला ईश्वर मिळाला की बघू

एक नक्षीदार तळवा भेटला
हात तो हातात आला की बघू

सांगण्याजोगी कथा माझी जरी
ऐकतो कोणी म्हणाला की बघू

२

ओठावरी कुणाच्या उरलो तरी पुरे
स्मरणात मी कुणाच्या जगलो तरी पुरे

जे सोडवीत होते आयुष्यभर मला
गेल्यावरी तयांना सुटलो तरी पुरे

पत्थर दगड धोंडा काही म्हणा मला
हातात मी कुणाच्या नसलो तरी पुरे

वाळू,वही,उखाण्यापैकी कुठे तरी
नावानिशी कधी मी दिसलो तरी पुरे

इतकीच प्रार्थना मी केली नभाकडे
नुसता उद्या सकाळी उठलो तरी पुरे

३

मी सोडवून बघतो,सुटतात फार थोडी
आहेत माणसे ही भलतीच गहन कोडी

माझेच स्वप्न केवळ बेकायदा निघाले
आली पहाट हाती घेऊन मग हतोडी

प्याल्यात अमृताच्या होते जहर चुकीने
काहीच फरक नव्हता अगदी तशीच गोडी

लागेल दु:ख घ्यावे,सुख ते सुटे मिळेना
म्हणतो दुकानवाला बनते अशीच जोडी

प्रगती म्हणून झाली अदलाबदल जराशी
झालेत सरळ रस्ते माणूस नागमोडी

जाळीत श्वासवाती जळतो कुणी किनारी
येते म्हणून गेली सांगून एक होडी

**४**

काळ कडवा होत गेला
शब्द हळवा होत गेला

कालचा तो धृवतारा
आज चकवा होत गेला

रांग वाढे मंदिरी अन्
काळ बडवा होत गेला

हात दोन्ही सारखे पण
एक उजवा होत गेला

अंगठया, दोरे, विभूती
संत फसवा होत गेला

बोल त्याचे,मौन त्याचे
एक फतवा होत गेला

**जयंत कुळकर्णी**

**अनंत ढवळे**

**१**

हसण्यात तुझ्या संभ्रम संभ्रम वेल्हाळी गा
माझ्यात उभे घनबन अवघे धुंडाळी गा

माणूस जसा वैराण बरड काटेराची
आभाळ जसे दो दिवसांची कागाळी गा

चालला उतू हा काळ असा चौबाजूंनी
वाऱ्यात कागदी जीव तुझा सांभाळी गा

**२**

एकही तडा वा रेघ उमटली नाही
माझ्यात जगाची नाहक पडझड झाली

संपते कधी ही ओंगळवाणी स्पर्धा
येतात नवे उन्माद जुन्यांच्या जागी

इतक्यात जमा  झालेत एवढे धागे
वाटते नव्याने जडण घडण होणारी

चल बेट बनू या महासागरामधले
एरवी अर्थ सापडणे शक्यच नाही

धादांत नवे वैयर्थ्य उमजणे आले
इतक्यात संपली गतकाळाची पांधी

**३**

बहुतेक दिसांची धुळवड पडते मागे
मग कोण पाहतो काय राहते मागे

ही परंपरेची धूळ उडत जाणारी
चुपचाप जशी की छाया फिरते मागे

आश्चर्य, संपते बाब समजण्याआधी
बस धडपडण्याची महती उरते मागे

लिहिणारा लिहितो चालत जाणे पण ही
जगण्याची उतरण नाहक बनते मागे

हे मूल्य चुकवणे योग्यच झाले बहुधा
निष्णात आपली वृत्ती हसते मागे

**अनंत ढवळे**

## प्रफुल्ल कुलकर्णी

### १

मी तर होतो चक्क निरुत्तर
मीच मला अनुभवल्यानंतर

जीन्स फ्रीज भातुकली खेळे
रडे चूल पोलके नी परकर

मी त्याच्या शब्दाची लज्जा
तो माझ्या शब्दाचे लक्तर

दुःखाचे परिमाण कोणते
सौख्याचे कोणते गुणोत्तर

श्वास आणखी श्वासासंगे
एक आठवण नित्य निरंतर

### २

दुःखाने धरली खपली
पण चिंता का हिरमुसली

भरतीला बेडी घाली
ओहोटी माझ्यामधली

कोणीच न जावू शकले
वेळेवर गाडी सुटली

थंडीला ठावे बहुदा
शेकोटी केंव्हा विझली

देहाच्या केरासाठी
आत्म्याची केली सुपली

**३**

निष्पत्ती शेवटी विचारी जाता-जाता
चर्चा मोठी की चर्चेचा प्रसंग मोठा

ज्याला मी ठेवले शेवटीच यादीच्या
तोच धावूनी स्पर्धेमध्ये आला पहिला

मोक्षाच्या दारात घुटमळे धर्मगुरू जो
झकास त्याला एखादी लावणी ऐकवा

मुक्या मनांच्या प्रतिनिधीची त-हा अशी;की
सभेमध्ये हा अबोल आणि घरी बोलका

हवी कशाला चर्चेची वेगळी तयारी
पुन्हा नव्याने उकरून काढू जुनाच मुद्दा

धरणाचा दरवाजा सांगे सत्य किती हे
एकाची सुटका म्हणजे दुस-याला धोका

पर्यटकांना बघा काय सांगतो पिंजरा
तुमच्यामधल्या प्राण्यांना माणसे दाखवा

**४**

शोधाया कारणे निघाली वाघाची पत्नी
का एका नेमक्याच वेळी गायी हंबरती

खेळाच्या तासात मुलांनो पतंग उडवू या
वर्गामधल्या वैफल्याची उडवूया खिल्ली

घरी एकटी तरुण मुलगी कामावर आई
पेंगुळलेली फलाटावरी गाडी शेवटची

भल्याभल्यांची शिडे बुडाली, जुगाड लाटांचा
स्वप्नांच्या वाळूत बांधली काचेची घरटी

याच विचारासवे डोंबही चितेकडे बघतो
त्यास अखेरी कशी मिळावी खरीखुरी मुक्ती

**प्रफुल्ल कुलकर्णी**

## समीर चव्हाण

### १

इतक्या गोष्टी अधांतराला
कशास द्यावी मुक्ती आधी

दुनियेला ह्या पुढे जावुदे
डुगडुग गाडी बरी आपली

कशाला हवे शहाणपण जे
मजा घालवी हरखण्यातली

खेळ घातला मर्जीने तर
संपवण्याची कशास घाई

जोडलेच तू इतके तर मग
होवुन दे ना एक आणखी

## २

व्यस्तश्या जगात ह्या काय चालले तुझे
ना कुणासही पता काय चालले तुझे

का कुणासही तुझी काळजी खरोखरी
ज्यासत्यास चौकश्या काय चालले तुझे

ह्याहुनी प्रतारणा आणखी न कोणती
पोकळी विचारणा काय चालले तुझे

ह्या तुझ्या अश्या तऱ्हा दुखवितात अंतरे
सांग एवढ्यात ना काय चालले तुझे

मी फिरून जग तुझे पाहिले जसेतसे
त्या तिथेच तू उभा काय चालले तुझे

साधल्याविना कसे साधतोस सर्व तू
लागते कुठे हवा काय चालले तुझे

**समीर चव्हाण**

## शिवाजी जवरे

### १

हाक तू ही न दिली मी पण वळलो कोठे
एकमेकास पुन्हा शोधून दिसलो कोठे

लोक गातील मला गीत गझल कवितेतून
मी अशा वृत्त न् छंदात बहरलो कोठे

थेट हातात तुझा हातच धरताना मी
भूल केली कुठली सांग बहकलो कोठे

पीत आलो नभ ओथंबून वर आलेले
मी गटारी अनुदानावर जगलो कोठे

ते किनाऱ्यावर थांबून विचारत होते
घेतला थांग कुठे मी अन् बुडलो कोठे

लोक ओलांडून जातात कसे ह्या गझला
शब्द एकेकच मज पुसतो अडलो कोठे

या जगाचीच हमेशा चूक शोधत फिरलो
चूक आता कळली आपण चुकलो कोठे

संगतीने जर माणूस परखला जातो
मी कुणा सोबत हप्ताभर टिकलो कोठे

शुष्कता कायम रोमातच भिनली माझ्या
तू किती कोसळला मी बघ भिजलो कोठे

## २

दिखावटी ह्या कळ्या-फुलांचे दुकान केले
मुळातले गंध रंग तू बंदिवान केले

पुकारुनीही कधीच धरतीवरी न येता
मलाच उचलून थेट तू आसमान केले

किती किती लोक रंगकामात हुन्नरी हे
मिळेल ते आडजातही सागवान केले

नदी भुई ध्वस्त त्रस्त मी आसमान केले
अशा खराबीविना कुणी का मकान केले

नकार आघात मानहानी तसेच निंदा
अशा गुरूंनी सदा मला सावधान केले

न ताल आहे न सूर आहे न शब्द सुद्धा
कसे तुझे मी लीपिविना प्रेमगान केले

तुझे इशारे तुझीच सूचना तुझीच आज्ञा
हरेक शब्दास मी तुझ्या संविधान केले

खरेच आवाज बंद होईल का कवीचा
सुसज्ज त्याच्या पुढ्यात जर पानदान केले

**३**

कोठल्याही वारशाचा मी कधी केला न दावा
सांग कोण्या यादवाला फुंकता आलाय पावा

शाश्वतीचे मार्ग नाही कूट कारस्थान कावा
सार्थकी लागेल नक्की अंतरीचा आर्त धावा

चांदणे अन् गार वारा एवढा देती इशारा
बंद आता बोलणे बस अधर अधरांनी धरावा

या वडाराची विनंती ऐकता का पंडितांनो
मोह दगडांचा नको अन् व्देष मूर्तीचा नसावा

सांधल्या जातील भेगा जोडल्या जातील तारा
वादळे येतील येवो तोल अपुला ना ढळावा

चातकाची आस दे पण चित्त दे मज सोशिकांचे
मेघ ओथंबून सारा माझिया वाणीत यावा

अंगणी माती दिसेना राहिली ना ओल रानी
वृक्ष लावा हे खरे पण सांग कोठे वृक्ष लावा

**४**

मी जिवाची अपुल्या चेतवूनी वात पुन्हा
दाट काळोख पुसायास बसे गात पुन्हा

पाहिले वाकून तू लाजत पाण्यावरती
दावला एक नवा चंद्र तलावात पुन्हा

पूर्ण वस्तीत तुझ्या एक दिसेना पुतळा
कोणता सांग तुझा धर्म तुझी जात पुन्हा

धर्म होतील नवे स्थापन माझ्यासाठी
मी बहिष्कृतच राहीन समाजात पुन्हा

तू नको न्हाउस पाण्यात खुले यावेळी
लावते काय उभी आगच डोहात पुन्हा

योजना पारित होतील महानगरांच्या
गाव विस्थापित होईल प्रकल्पात पुन्हा

खुद्द वाऱ्यावर ज्याचे जगणे विस्कटले
तो जगातील व्यथा बांधीन शब्दात पुन्हा

मी कळ्या टाळून काटे उचलाया फिरतो
कोण देईल मला साथ प्रवासात पुन्हा

**शिवाजी जवरे**

**विजय दिनकर पाटील**

**१**

जुमानेनाच जर हे तण कशाला
इमानाने करू खुरपण कशाला

तसे राहूच आपण ओळखीचे
परंतू फारशी घसटण कशाला

पुढे लागेल की नंबर तुझाही
तुला आताच ते दडपण कशाला

हवा पाणी मने सारेच दूषित
इथे नाही तुझी लागण कशाला

समेटाची गरज आहे मलाही
पुन्हा उकरू जुने प्रकरण कशाला

**२**

नका चिंता करू शनिवार असताना
इथे सारेच कर्तबगार असताना

इथे थांबून जमते तेवढे मिळवू
कुठे भटकायचे घरदार असताना

किती चालायचे रेषेत एका मी
इथे रस्ताच वक्राकार असताना

कसे शोभेल आपण मोडणे आता
ठरत आल्यापरी व्यवहार असताना

नको बाहेर पडणे आणि गारठणे
पुरेसा कोष हा उबदार असताना

परत जाऊ नको तू रिक्त हातांनी
उभा डोळ्यांपुढे बाजार असताना

तुझ्या शर्थीमुळे तर हा दिवस दिसला
कुठे लपलास तू सत्कार असताना

उरकल्यासारखे का वाटते जगणे
पुढे कित्येक सोपस्कार असताना

**विजय दिनकर पाटील**